राज्यातील शासकीय जिल्हा परिषद, पंचायत समित्या, मधील वर्ग-३ व वर्ग-४ ची पदे पुढील आदेशापर्यन्त भरण्यास स्थगिती.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक:एसआरव्ही-२००३/प्र.क्र.३/०३/१२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :१ ऑगस्ट,२००३.

वाचा :- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२००३/ प्र.क्र.३/०३/१२, दिनांक १० मार्च,२००३.

# परिपत्रक

रोजगार हमी योजनेतील हजेरी सहाय्यक, सर्वश्री शेख मुबारक आणि श्री.हौशिराम डांगे यांनी मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठामध्ये दाखल केलेल्या याचिका क्रमांक:४/२००० आणि ८३/२००३ चे संदर्भात मा.उच्च न्यायालयाने दि.२८/२/२००३ रोजी दिलेल्या निर्णयानुसार रोजगार हमी योजनेतील सर्व हजेरी सहाय्यकांचे नियोजन विभागाच्या शासन निर्णय, क्र.हसका-१३९४/प्र.क्र.१८५/रोहयो-३, दि.१/१२/१९९५ च्या आदेशानुसार शासन/जिल्हा परिषद,पंचायत समित्यांच्या सेवेमधील वर्ग-३ व वर्ग-४ पदावर समावेशन पूर्ण होईपर्यन्त राज्यातील केवळ सर्व शासकीय/जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्यातील वर्ग-३ व वर्ग-४ ची पदे (तांत्रिक व शिक्षण सेवक/सहायक शिक्षक ही पदे वगळून) भरण्यावर स्थगिती देण्याचे आदेश संदर्भाधीन क्रमांक १ येथील दि.१० मार्च,२००३ अन्वये देण्यात आले आहेत.

२. मा.उच्च न्यायालयाच्या या निर्णयास अनुसरुन शासनाने वरील संदर्भाधीन दि.१० मार्च,२००३ च्या आदेशान्वये नियुक्त्या करण्यास दिलेले स्थगिती आदेश शिथिल करुन मागासवर्गीयांसाठी आरक्षित पदे /अनुशेषाची पदे भरण्याकरिता परवानगी मिळावी, याकरिता मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठामध्ये सिव्हील अर्ज क्र.४२४४/२००३ दाखल करण्यात आला होता. सदर अर्ज विचारात घेऊन मा.उच्च न्यायालयाने दि.२५ जुलै,२००३ रोजी खालील प्रमाणे निदेश दिले आहेत. :-

"While we permit the State Government to proceed to fill in the backlog of reserved posts in class III and class IV posts, we direct that in the process the Mustering Assistants numbering 1506 shall be absorbed first and if in any particular district a Mustering Assistant belonging to the reserved category does not have a vacancy, he shall have to accept an appointment in any other district anywhere in the State. We accordingly modify our restraint order dated 28.2.2003 passed in LPA No.83 of 2003. We also direct the state Government to consider the cases like compassionate appointments, appointments of wards of

freedom fighters, project affected persons and Ansha Kalin employees and they should be given preference while undertaking this special drive to fill in the backlog in the reserved."

३. मा.उच्च न्यायालयाच्या खंडपीठाने दिलेले वरील आदेश लक्षात घेता संदर्भाधीन दि.१० मार्च, २००३ चे आदेश अंशतः शिथिल करुन खालील प्रमाणे सुधारीत आदेश देण्यात येत आहेत. :-

राज्यातील सर्व शासकीय/जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्यातील वर्ग-३ व वर्ग-४ ची पदे भरण्यास देण्यात आलेली स्थगिती केवळ मागासवर्गीयांच्या अनुशेषाची पदे भरण्याकरिता यापुढे लागू राहणार नाही. मात्र अनुशेषाची ही पदे भरताना :-

(१) सर्वप्रथम जिल्हाधिका-यांकडे हजेरी सहाय्यकांच्या असलेल्या प्रतिक्षा सूचीतील संबंधित प्रवर्गाच्या मागासवर्गीय हजेरी सहाय्यकांचे वर्ग-३ व वर्ग-४ च्या त्या त्या प्रवर्गाच्या रिक्त पदांवर समावेशन करावे.

जिल्हयातील अनुशेषाची सर्व पदे भरल्यानंतरही हजेरी सहाय्यकांच्या सूचीत जर मागासवर्गीय शिल्लक राहिले तर त्याच्या राज्यातील अन्य जिल्हयात अनुशेषाच्या पदांवर समावेशन करुन नियुक्त्या कराव्यात.

(२) वरील (१) प्रमाणे मागासवर्गीय हजेरी सहाय्यकांचे समावेशन पूर्ण झाल्यावर देखील अनुशेषाची आणखी काही पदे शिल्लक असतील,तर ती पदे भरताना अनुकंपा, स्वातंत्र्यसैनिकांचे पाल्य, प्रकल्पग्रस्त आणि अंशकालीन कर्मचारी यांच्या प्रतिक्षासूचीतील संबंधित प्रवर्गाच्या मागासवर्गीय उमेदवारांचा अनुशेषाच्या पदांवर नियुक्तीसाठी प्राथम्याने विचार करावा.

(३) वरील क्र.(१) प्रमाणे राज्यातील अन्य जिल्हयातील अनुशेषांच्या पदावर हजेरी सहाय्यकांचे समावेशन करताना संबंधित जिल्हयाच्या जिल्हाधिका-याकडील प्रतिक्षा सूचीत संबंधित प्रवर्गाचे मागासवर्गीय हजेरी सहाय्यक उपलब्ध नसतील तर अन्य जिल्हाधिका-यांकडे उपलब्ध असलेल्या प्रतिक्षा सूचीतून संबंधित प्रवर्गाच्या मागासवर्गीय हजेरी सहाय्यकांना नियुक्ती देऊन त्यांचे समावेशन करावे.

४. मा.उच्च न्यायालयाच्या सुधारित आदेशाचे काटेकोरपणे पालन केले जाईल याची सर्व नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**चारुशीला सोहोनी**
**प्रधान सचिव (सेवा)**

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री/राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद) मुंबई,
* राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग,नवीन प्रशासकीय भवन,मंत्रालयासमोर,मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे) कोकण भवन, नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निरनिराळया मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.
* पत्राने.

-----------